कारागृहातील बंद्यांना प्रायोगिक तत्वावर कर्जसुविधा उपलब्ध करून देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. जेएलई-०१२२/प्र.क्र.३/तुरूंग-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२२.

संदर्भ :-

१. अध्यक्ष, प्रशासकीय मंडळ, दि. महाराष्ट्र स्टेट को-ऑप. बँक लि. यांचा दि. १४.१२.२०२१ रोजीचा प्रस्ताव.
२. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. कैदी कर्ज सुविधा/६७००/२०२१, कक्ष - ९ (क), दि.०६.१२.२०२१.
३. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. लेखा विभाग/दि.म.स्टे.को.ऑ.बँक/कैदी कर्ज सुविधा/९९४/२०२२, कक्ष - ५, दि.०४.०२.२०२२.

**प्रस्तावना :-**

कारागृहामध्ये अनेक बंदी दीर्घमुदतीची शिक्षा भोगत असतात. यातील बहुसंख्य बंदी हे कुटूंबातील प्रमुख व्यक्ती असल्याने अशा बंद्यांना दीर्घकाळ तुरूंगात रहावे लागल्यामुळे त्यांचे संपुर्ण कुटूंब हवालदिल होणे, कुटूंबियामध्ये औदासिन्य, नैराश्य, अपराधीपणाची जाणीव, संवेदनशीलता नष्ट होणे तसेच तुरूंगात गेलेल्या व्यक्तीने कौटुंबिक कर्तव्यात कसूर केल्याची भावना कुटूंबात निर्माण होणे यासारख्या समस्यांना तोंड द्यावे लागते. अशा परिस्थितीत बंद्यास त्याच्या कुंटुंबाच्या गरजेकरिता कर्जरूपाने रक्कम उपलब्ध करून दिल्यास बंद्याबद्दल कुटुंबियामध्ये सहानुभूती व प्रेम वाढून कुटूंबातील वातावरण सुद्दढ राहण्यास मदत होईल. सदर बाब विचारात घेऊन बंद्यांच्या जीवनमानात सुधारणा व त्यांच्या पुनर्वसनाच्या दृष्टीने एक नाविन्यपूर्ण योजना आहे. या अभिनव योजनेत अंदाजे १०५५ बंद्यांना योजनेचा लाभ होऊ शकतो.

बंद्यांबाबतचा पुनर्वसनात्मक दृष्टीकोन तसेच सदर योजनेचा सामाजिक आशय बघता प्रस्तावित योजनेस मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

कारागृहातील शिक्षाधीन बंद्यांना त्यांच्याकडून करून घेण्यात येणाऱ्या कामाकरिता मिळणाऱ्या बंदीवेतनातून दि. महाराष्ट्र स्टेट को-ऑप. बँक लि. या बँकेमधून रू.५०,०००/- पर्यंत इतक्या रकमेचे द.सा.द.शे. ७% इतक्या व्याज दराने कर्ज उपलब्ध करून देण्याच्या योजनेस येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे येथे प्रायोगिक तत्वावर राबविण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत कर्जसुविधेत बंद्याची कर्ज मर्यादा, बंद्याच्या शिक्षेचा कालावधी, त्यामधून त्याला मिळू शकणारी संभाव्य सूट, बंद्याचे वय, वार्षिक कामाचे अंदाजे दिवस, प्रति दिवसाचे किमान उत्पन्न यावर ठरविण्यात येईल. अशा प्रकारच्या कर्जाला जामिनदारांची आवश्यकता असणार नाही. सदर कर्ज हे संबंधित बंद्याला विनातारणी व केवळ व्यक्तीगत हमीवर देण्यात येईल.

३. योजनेची पात्रता/निकष खालीलप्रमाणे असतील.

**अ)** बंद्याचा पहिलाच गुन्हा असावा.

**ब)** कर्जाचे कारण कुटूंबाच्या गरजा भागविण्यासाठी, मुलांच्या शिक्षणासाठी, वकीलांची फी देण्याकरिता, कायद्याने मान्य असलेल्या वस्तू खरेदी करण्याकरिता असावे.

**क)** बंद्याच्या शिक्षेचा कालावधी ३ वर्षे किंवा त्यापेक्षा जास्त शिल्लक असेल असे बंदी सदर योजनेस पात्र असतील.

**ङ)** व्याजदर द.सा.द.शे. ७ % इतका असेल.

४. योजना खाली नमूद अटींच्या अधिन राबविण्यात मंजूरी देण्यात येत आहे.

**क)** कर्जदार बंद्यांची खाती बँकेच्या शाखांमधून उघडून देणे, बंद्यांकडून संमतीपत्र लिहून घेणे या अनुषंगाने येणारी इतर कामे याकरिता कारागृह प्रशासन/शासनाकडून कोणतीही मदत अपेक्षित असणार नाही.

**ख)** कर्जाच्या परतफेडीसाठी कोणतीही कायदेशीर जबाबदारी कारागृह प्रशासन/शासनावर राहणार नाही. यासंदर्भात कारागृह प्रशासन/शासन व संबंधित बँक यांच्यामध्ये सामंजस्य करार करण्यात यावा. या सामंजस्य करारातील अटी व शर्तीनुसार योजना राबविण्याचे बंधन उभयतांवर राहील.

**ग)** कारागृहातील बंद्यांना देण्यात येणाऱ्या कर्जाकरिता प्रोसेसिंग फी अथवा त्यानुषंगाने आकारण्यात येणारी कोणतीही इतर फी यासाठी शासन/कारागृह प्रशासन बांधील असणार नाही.

**घ)** कारागृहातील बंद्यांना देण्यात येणाऱ्या कर्जाची मर्यादा ठरविण्याची जबाबदारी पूर्णपणे बँकेची असेल, यात कोणत्याही प्रकारे शासन/कारागृह प्रशासनाची भूमिका असणार नाही.

**ङ)** कारागृहातील बंद्यांना देण्यात आलेल्या कर्जाच्या वसुलीस कोणत्याही प्रकारे अथवा कारणाने शासन/कारागृह प्रशासन जबाबदार असणार नाही.

**च)** बंद्यांना देण्यात येणाऱ्या कर्जाच्या रकमेचा उपयोग संबंधित बंदी स्वतःच्या कुटूंबाच्या गरजा भागविण्यासाठी अथवा आपल्या वकीलांची फी देण्यासाठी अथवा इतर कायदेशीर बाबींसाठीच करेल याची दक्षता व जबाबदारी सर्वस्वीपणे बंद्यास कर्ज देण्याऱ्या बँकेची असेल.

**छ)** बँकेकडून कर्जाच्या परतफेडीमधुन वसूल करण्यात येणाऱ्या रकमेच्या १ % इतका वार्षिक निधी कैद्यांचा "कल्याण निधी" (Prisoner's Welfare Fund) ला देण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२९१७५७४९८४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIRUDDHA V JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA V JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, pseudonym=A29ED764E36FC94AB894683327375533A01AD102, serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA V JEWLIKAR
Date: 2022.03.29 18:00:52 +05'30'

**( अनिरूध्द व्यं. जेवळीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
५. मा.अध्यक्ष , महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
७. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८. मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. गृह राज्यमंत्री (शहरे/ग्रामिण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१०. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर पोलीस महासंचाकलक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. प्रशासक, दि. महाराष्ट्र स्टेट को-ऑप. बँक लि.
१४. निवडनस्ती/तुरुंग- १.